**इतर मागास बहुजन कल्याण संचालनालयातील संचालकांच्या एक निर्लेखित वाहनाच्या बदली नवीन वाहन खरेदी करण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : खरेदी २०२४/प्र.क्र.५६/आस्थापना-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दि. २६ ऑगस्ट, २०२४.

**संदर्भः** १) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांकः-वाहन-१०००/प्र.क्र.६५/२००१/विनियम, दि.१० सप्टेंबर, २००१.
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांकः-वाहन-२०२४/प्र.क्र.११/विनियम, दि.०२ फेब्रुवारी, २०२४.
३) संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय यांचे पत्र क्रमांकः-इमाबकसं /संचालक / वाहन / तरतूद/२०२४ / १६४६, दि.१७ मे, २०२४.

**प्रस्तावना:-**

इतर मागास बहुजन कल्याण संचालनालयाने संदर्भाधीन क्रमाकं ३ येथील दि. १७ मे, २०२४ च्या पत्रान्वये, निर्लेखित केलेल्या वाहनाच्या बदली नवीन वाहन खरेदीस मंजुरी देण्यासाठीचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक १ येथील दि. १० सप्टेंबर, २००१ च्या शासन निर्णयान्वये शासकीय व इतर कार्यालयांसाठी वाहनांच्या वापरासंबंधी धोरण विहित करण्यात आले आहे. तसेच संदर्भ क्रमांक २ येथील दि. ०२ फेब्रुवारी, २०२४ च्या शासन निर्णयान्वये शासकीय वाहनांचे किंमत मर्यादा धोरणाबाबत सूचना देण्यात आल्या आहेत. त्याच्या अधीन संचालनालयाच्या प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

इतर मागास बहुजन कल्याण विभागाच्या अधिनस्त इतर मागास बहुजन कल्याण संचालनालयातील एक निर्लेखित वाहनाच्या बदली नवीन वाहन वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक १ व २ येथील शासन निर्णयाच्या अधीन राहून संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय यांना राज्यस्तरीय विभाग प्रमुख म्हणून ₹ १२ लक्ष या किंमत मर्यादेत खरेदी करण्यासाठी खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहेः-

**अटीः-**

१) इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय पुणे यांनी ₹ १२ लक्ष या मर्यादेत (वाहनाची किंमत + टेम्परररी रजिस्टेशन चार्जेस + साहाय्यभूत साहित्य Accessories इत्यादी अंतर्भूत करुन) वाहन खरेदी करण्यात यावे.

२) निर्लेखित केलेल्या क्रमांक एमएच-१२-एएच-८६५१ या वाहनाचा विभागाच्या वाहन आढाव्यात समावेश आहे याची खातरजमा नवीन वाहन खरेदी करण्यापूर्वी संचालनालयाने करणे आवश्यक राहील.

३) इतर मागास बहुजन विभाग (खुद्द) व विभागाच्या संचालनालयाच्या अधिनस्त कार्यालयांचा सुधारित वाहन आढावा एक महिन्याच्या आत वित्त विभागास सादर करण्याच्या अटीवर सदर मान्यता असल्याने विभागाच्या संचालनालयाच्या अधीनस्त कार्यालयांचा सुधारित वाहन आढावा विहित मुदतीत पूर्ण करुन तसा प्रस्ताव शासनास सादर करणे आवश्यक राहील,

४) नवीन वाहन खरेदी करण्यासाठी आवश्यक निधी उपलब्ध असल्याची खातरजमा करून खरेदी करण्यात यावी,

५) शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार विहित कार्यपध्दतीचा अवलंब करुन Gem portal वर निविदा दाखल करून नवीन वाहन खरेदी करावे,

६) निर्लेखित केलेल्या वाहनाच्या बदली यापूर्वी नवीन वाहन खरेदी केलेले नाही याबाबतचे प्रमाणपत्र शासनास खरेदीपूर्वी उपलब्ध करून देण्यात यावे.

२. सदर वाहन खरेदीसाठी येणारा खर्च मागणी क्रमांक झेड जी-३, २२२५, अनुसूचित जाती,जमाती व इतर मागास वर्ग अल्पसंख्याक यांचे कल्याण, ०३ मागासवर्गीयांचे कल्याण, ००१ संचालन व प्रशासन, (०१) विमुक्त जाती, भटक्या जमाती,इतर मागास विशेष मागास प्रवर्ग यांचे कल्याण, (०१) (०१) विमुक्त जाती, भटक्या जमाती, इ.मा.व. व वि.मा.प्र. संचालनालय (अनिवार्य) (२२२५ ई ७९५) १३, कार्यालयीन खर्च या लेखाशीर्षाखाली सन २०२४-२५ या वित्तीय वर्षात मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २९५ /२०२४ / विनियम, दि.०८.०८.२०२४ आणि राज्यस्तरीय वाहन आढावा समितीच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

४. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०२४०८२६१६०५५५२३३४ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DINESH ROHIDAS CHAVAN

Digitally signed by DINESH ROHIDAS CHAVAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=c0edee7a8805e86e41846cf28cf151b9ce48bb88ebf4f2e8a7fc10e8dcad98ec, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8C2377ED235498603821D49922A210871FF6FB9B369722AC707AEE7DCD87F2BD, cn=DINESH ROHIDAS CHAVAN
Date: 2024.08.26 16:21:08 +05'30'

**( दिनेश रो. चव्हाण )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत**:-

महालेखापाल (लेखापरीक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर
प्रधान सचिव, इतर मागास बहुजन कल्याण यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
संचालक,इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे.
वित्त विभाग, (विनियम/व्यय-१४), मंत्रालय, मुंबई.
जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
निवड नस्ती (आस्थापना-२).